**अधिक्षक अभियंता, ई- प्रशासन मंडळ, पुणे या कार्यालयाच्या प्रशासकीय व तांत्रिक नियंत्रणात बदल करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०२३/प्र.क्र.४/आ( पुर्नरचना )**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग ,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २१ जुलै, २०२३.

**वाचा :-**१) जलसंपदा विभाग, शासन निर्णय, क्रमांक : ई-प्रशासन-२०१६/३६/२०१६/लपा-१, दि. ०२.०४.२०१६.
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय, क्र : आढावा-२०१८/प्र.क्र.१४२/२०१८/आ.(प्रशि ), दि.२०.०८.२०१८.
३) जलसंपदा विभाग,शासन शुध्दीपत्रक,क्र : आढावा-२०१८/प्र.क्र.१४२/२०१८/आ.(प्रशि ), दि.०४.०९.२०१८.

**प्रस्तावना :-**

शासनाच्या ई-प्रशासन धोरणाच्या अनुषंगाने माहिती तंत्रज्ञानाचा वापर करुन जलसंपदा विभागाच्या विविध कार्यप्रकारात अधिकाधिक कार्यक्षमता आणण्याच्या दृष्टीने तसेच नवनवीन ई-प्रशासन प्रकल्प सुलभतेने राबविण्याकरीता संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.०२.०४.२०१६ अन्वये अधीक्षक अभियंता, प्रकल्प तयारी व व्यवस्थापन कक्ष (मजसुप्र), मंत्रालय, मुंबई या मंडळ कार्यालयाचे रुपांतरण अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई - प्रशासन मंडळ, मुंबई या कार्यालयामध्ये करण्यात आले आहे.

२. जलसंपदा ई - प्रशासन मंडळ कार्यालयाचे मुख्यालय व मंडळ कार्यालयाच्या नियंत्रणाखाली कार्यरत विभागीय कार्यालयांच्या मुख्यालयातील भौगोलिक अंतरामुळे पुणे येथे कार्यरत विभागीय कार्यालयांच्या कामकाजावर संनियत्रण ठेवण्यास व कार्यालयास नेमून दिलेली उद्दिष्टे पूर्ण करण्यात अडचणी निर्माण झाल्याने प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.२०.०८.२०१८ अन्वये जलसंपदा ई-प्रशासन मंडळ कार्यालयाचे मुख्यालय मुख्य अभियंता (जलसंपदा) जलसंपदा विभाग, पुणे यांच्या नियंत्रणाखाली पुणे येथे स्थलांतरीत करण्यात आले होते. त्यानंतर संदर्भ क्र.३ येथील शासन शुध्दीपत्रक दि.०४.०९.२०१८ अन्वये ई- प्रशासन मंडळ या मंडळ कार्यालयाचे नियंत्रण मुख्य अभियंता (विनिर्दिष्ट प्रकल्प ), जलसंपदा विभाग, पुणे यांच्याकडे सोपविण्यात आले.

३. मुख्य अभियंता ( विप्र ), जलसंपदा विभाग, पुणे हे पुणे जिल्हातील सिंचन प्रकल्पांसाठी कार्यरत असलेले क्षेत्रिय प्रादेशिक कार्यालय असून सदर कार्यालयाच्या कामकाजाची व्याप्ती अत्यंत व्यापक आहे. त्यामुळे या कार्यालयाला ई प्रशासन मंडळाच्या कामकाजाला परिणामकारक पध्दतीने वेळ देण्यास मर्यादा येत आहेत. तसेच त्यांचे कार्यक्षेत्र हे पुणे प्रदेशापुरते मर्यादित असल्याने राज्यातील इतर पाटबंधारे विकास महामंडळ अथवा क्षेत्रीय कार्यालयांशी संपर्क साधताना अडचणी निर्माण होत आहेत. यास्तव ई प्रशासन मंडळ कार्यालयाच्या उद्दिष्टांचे प्रभावी नियोजन व संनियंत्रण करुन विविध प्रणालींचे विकसन व परिणामकारक अंमलबजावणी करता यावी, याकरीता सदर मंडळ कार्यालयाच्या प्रशासकीय व तांत्रिक नियंत्रणात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

अधिक्षक अभियंता,जलसंपदा ई-प्रशासन मंडळ,पुणे या कार्यालयाचे प्रशासकीय व तांत्रिक नियंत्रण **मुख्य अभियंता (विनिर्दिष्ट प्रकल्प), जलसंपदा विभाग, पुणे** यांचेऐवजी **मुख्य अभियंता (स्थापत्य) , जलविदयुत प्रकल्प व गुणनियंत्रण पुणे** यांचेकडे सोपविण्यात येत आहे.

२. संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय, दि.०२.४.२०१६ मधील परि.क्र.३ व ४ तसेच सुधारित आकृतीबंधास मान्यता मिळेपर्यंत परि.क्र.७, ८ व संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयातील परि.क्र.२ मधील लागू असलेल्या तरतूदी कायम राहतील.

३. वरील प्रमाणे होणाऱ्या नियंत्रणातील बदल हे सदर आदेशाच्या दिनांकापासून अंमलात येतील याद्दष्टीने मुख्य अभियंता ( स्थापत्य ), जलविदयुत प्रकल्प व गुणनियंत्रण पुणे यांनी आवश्यक कार्यवाही तात्काळ करावी. तसेच या मंडळ कार्यालयांतर्गत कार्यरत अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व इतर भत्ते हे प्रचलित कार्यपध्दतीनुसार अदा करण्यात यावे.

४. जलसंपदा ई- प्रशासन विषयक मंत्रालय स्तरावरील कामे उप सचिव तथा अधीक्षक अभियंता (निवसं) हे पाहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०७२११५५४३२५१२७ हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

UDDHAV R DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, pseudonym=DDF7D61D2ADB9D0A26CF5E52D408A84E1CEB62A8, serialNumber=2D80774C9ED65ECA9BE69006934BFB5C4CA32AB0DC1A2EC5746398458BDF1C37, cn=UDDHAV R DAHIPHALE
Date: 2023.07.21 15:57:30 +05'30'

**( उध्दव दहिफळे )**
**उप सचिव, जलसंपदा विभाग.**

**प्रत,**

१) म.उपमुख्यमंत्री ( जलसंपदा ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव ( जलसंपदा ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव ( जसंवि व लाक्षेवि ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव ( प्रकल्प समन्वय ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल१/२ ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६) महालेखापाल१/२ ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, (मेरी) नाशिक
९) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपद विभाग.
१०) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) आंतर वित्तीय सल्लागार व सह/उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सह सचिव (सेवा)/उप सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
१४) सर्व मुख्य अभियंता/ अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.

१५) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयात झालेल्या बदलाची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)

१६) कार्यासन आस्थापना ( पुनर्रचना ) निवडनस्ती.